ग्रामपंचायतीचे सचिव असलेल्या ग्रामसेवक/ग्राम विकास अधिकारी यांनी माहिती देण्याबाबत.
जिल्हा परिषद स्तरावर घ्यावयाची दक्षता.

महाराष्ट्र शासन
शासन परिपत्रक क्र.एपिटी -२०११/प्र.क्र. १४२/आस्था -९,
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक : ३ मे, २०११.

वाचा : राज्य माहिती आयोग, पुणे खंडपीठ यांचे दि.२१-३-२०११ चे आदेश क्र.अपील/१०८८/सोलापूर.

**शासन परिपत्रक :**

शासनाचे एका प्रकरणात असे निदर्शनास आले आहे की, सन २००९ मध्ये ग्रामपंचायतीचा कार्यभार स्वीकारलेल्या ग्रामसेवकाने त्याच्या कार्यकालातील ग्राम पंचायतीची उपलब्ध माहिती दिली, तथापि, सन २००० ते २००६ या कालावधीची माहिती तत्कालीन ग्रामसेवकाकडून त्यांना त्यावेळचा पदभार त्यास मिळाला नसल्याने माहिती देता आली नाही. त्यामुळे ग्रामपंचायत स्तरावर कागदपत्र अभिलेख उपलब्धता राहण्याच्या दृष्टीकोनातून शासन पुढीलप्रमाणे सूचना देत आहे :-

(१) ग्रामसेवकांनी त्यांचा पदभार सांभाळताना त्यांच्या अखत्यारित सर्व कागदपत्रे, नोंदवह्या व इतर सर्व अभिलेख अद्यावत ठेवून त्याबाबत विस्तार अधिकारी (पंचायत) यांचे प्रमाणपत्र प्रत्येक तिमाहीच्या शेवटी घेऊन ते अभिलेखात ठेवावे. याबाबत संबंधितांकडे नियमितपणे पाठपुरावा करण्याची जबाबदारी ग्रामसेवक/ ग्राम विकास कक्ष अधिकारी (पंचायत) यांची राहिल.

(२) अ.क्र. (१) अन्वये दिलेल्या प्रमाणपत्राची प्रत विस्तार अधिकारी (पंचायत) यांनी गट विकास अधिकाऱ्याकडे लगेचच पाठवावी.

(३) ग्रामसेवक / ग्राम विकास अधिकारी यांची एका ग्रामपंचायतीमधून दुसऱ्या ग्रामपंचायतीमध्ये बदली झाल्यानंतर संबंधितांनी लगेचच कार्यभार हस्तांतरण पूर्ण करावे.

(४) उपरोक्त ग्रामपंचायतीच्या कार्यभार व सर्व दफ्तर हस्तांतरणास ७ दिवसांहून अधिक विलंब झाल्यास त्यास जबाबदार ग्राम विकास अधिकारी / ग्रामसेवक यांच्याविरुध्द गट विकास अधिकारी यांनी विभागीय कारवाई प्रस्तावित करुन ती ३ महिन्यात पूर्ण करावी व त्याचा अहवाल मुख्य कार्यकारी अधिकारी यांना लगेचच पाठवावा.

(५) ग्राम विकास अधिकारी / ग्रामसेवक यांच्या बदलीच्या दिनांकानंतर ७ दिवसात हस्तांतरण पूर्ण न केलेल्या संबंधिताविरुध्द उपरोक्त अ.क्र. (४) अन्वये ३ महिन्यात विभागीय कारवाई न करणाऱ्या गट विकास अधिकाऱ्याविरुध्द मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी त्यांचे स्तरावर ३ महिन्यात पुढील प्रशासकीय कार्यवाही पूर्ण करावी व त्याचा अहवाल विभागीय आयुक्त यांना लगेच सादर करावा.

(६) विभागीय आयुक्त यांनी वरील कार्यवाहीचा आढावा त्यांच्या नियतकालिक बैठकीत घ्यावा.

(७) माहितीचा अधिकार २००५ च्या कलम ४ अन्वये सर्व कागदपत्रे नागरिकांसाठी जाहीर स्वरुपात उपलब्ध राहणे आवश्यक आहे. या तरतूदीचे सर्व जिल्हा परिषदांनी दक्षतापूर्वक पालन करणे आवश्यक आहे. त्यामुळे ग्रामपंचायतीचे दफ्तर हस्तांतरण पार न पाडता नवीन ग्रामपंचायतीच्या ठिकाणी रुजू होणाऱ्या वा जिल्हा परिषद सेवेमधून सेवानिवृत्त होणाऱ्या ग्राम विकास अधिकारी / ग्रामसेवक यांच्याविरुध्द अशा कसूरीबाबत महाराष्ट्र जिल्हा परिषद जिल्हा सेवा (शिस्त व अपील) नियम १९६४ नुसार कारवाई करणे, तसेच याबाबत महाराष्ट्र जिल्हा परिषद जिल्हा सेवा नियम, १९६८ नुसार नियुक्ती प्राधिकारी म्हणून असलेल्या प्रदत्त अधिकारात मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी दक्षतापूर्वक कार्यवाही करणे आवश्यक आहे. याबाबत जिल्हा परिषदेच्या वर्ग-३ व ४ च्या कर्मचाऱ्यांबाबत शासनाचे अधिकार प्रदान केलेल्या विभागीय आयुक्त यांनी त्याबाबत संनियंत्रण करणे आवश्यक आहे. या बाबीचा पुनरुच्चार करण्यात येत आहे.

(८) याबाबत शासनाचे असेही आदेश आहेत की, वरीलप्रमाणेच आवश्यक ती कारवाई जिल्हा परिषदेमधील सर्व जन माहिती अधिकारी व अपिलीय प्राधिकारी यांचेसंदर्भात मुख्य कार्यकारी अधिकारी यांचेकडून करण्यात यावी.

हे शासन परिपत्रक **संगणक संकेतांक क्रमांक** २०११०५०३१२०१३३००१ अन्वये www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( सुधीर ठाकरे )
**सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रति,

१) विभागीय आयुक्त, सर्व विभाग.
२) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.
३) सर्व सह सचिव/ उप सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय,मुंबई
४) निवड नस्ती / आस्था-९, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.